**पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य कार्यालयाच्या अधिनस्त पोलीस घटकांमधील अंमलदार संवर्गासाठी पदोन्नतीच्या संधीमध्ये वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पीएमएन- ०८२१/प्र.क्र.५३३/पोल-५ ब,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २५ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ :**- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वेतन-१११९/प्र.क्र.३/२०१९/सेवा-३, दि.०२.०३.२०१९

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.विपधो- २६२०/प्र.क्र.१६/का.१७, दि.३१.०३.२०२१

३) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२६-अ/४७/पोउपनि अति.पदे/८१/२०२१, दि.२१.०६.२०२१

४) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२६-अ/४७/पोउपनि अति.पदे/८१/२०२१, दि.०३.०८.२०२१

५) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२६-अ/४७/पोउपनि अति.पदे/८१/२०२१, दि.१६.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

पोलीस अंमलदारांना पदोन्नती साखळीमध्ये सामान्यत: पोलीस शिपाई - पोलीस नाईक - पोलीस हवालदार - सहायक पोलीस उप निरीक्षक अशा तीन पदोन्नतीच्या संधी मिळतात. सर्वसाधारणपणे एका पदावर १० वर्षे सेवा कालावधी नंतर पदोन्नती मिळणे अपेक्षित आहे. परंतु सद्य:स्थितीत वरच्या श्रेणीतील पदसंख्यांमुळे अपेक्षेपेक्षा दीर्घ कालावधी लागतो. तसेच पोलीस अंमलदारांना सातव्या वेतन आयोगाच्या आश्वासित प्रगती योजनेनुसार १०, २०, ३० वर्षांच्या सेवेनंतर योजनेच्या अटी व शर्ती पूर्ततेनंतर टप्पानिहाय वरच्या पदाची वेतन श्रेणी मंजूरी देण्यात येते. शासनाच्या पदोन्नती धोरणानुसार पदोन्नतीकरीता एका पदावर किमान ०३ वर्षे सेवेच्या अनुभवाची सर्वसाधारण अट असते. सहायक पोलीस उप निरीक्षक या पदावर ०३ वर्षे सेवा पूर्ण होण्याआधीच काही सहायक पोलीस उप निरीक्षक हे सेवानिवृत्त होतात. किंवा काही अंमलदार हे पोलीस हवालदार पदावरूनच सेवानिवृत्त होतात. अशा अंमलदारांना पोलीस उप निरीक्षक पदावर पदोन्नतीची संधी मिळत नाही. तसेच, प्रचलित सेवा प्रवेश नियमानुसार पोलीस अंमलदार यांना पोलीस उपनिरीक्षक या पदाच्या पदोन्नतीसाठी अर्हता परीक्षा उत्तीर्ण करणे बंधनकारक आहे.

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक विपधो- २६२०/प्र.क्र.१६/का.१७, दि.३१.०३.२०२१ नुसार शासकीय कर्मचाऱ्यांच्या विभागीय परीक्षेमधील नियमात समानता रहात नसून अनेक सेवाविषयक

अडचणी उद्भवत आहेत. त्यामुळे ज्या ज्या शासकीय पदांसाठी विभागीय परीक्षा नियम बनविण्यात आले असून त्यानुसार परीक्षा आयोजित करण्यात येतात, त्या सर्व विभागीय परीक्षांमधील सामाईक बाबींसाठी एक समान धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार शासकीय कर्मचाऱ्याने सध्याच्या पदावर किमान १५ वर्षे सेवा पूर्ण केल्याचा दिनांक किंवा त्यांच्या वयाची ५० वर्षे पूर्ण झाल्याचा दिनांक यापैकी जे नंतर घडेल त्यानंतर लगतच्या दिनांकास त्यास सदर परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात आलेली आहे.

पोलीस उप निरीक्षक पदावर होणाऱ्या पदोन्नतीस संदर्भातील न्यायालयामध्ये दाखल करण्यात आलेल्या याचिकांसंदर्भात मा.उच्च न्यायालय यांनी रिट याचिका क्र.४०७८/२०१५ मधील परिच्छेद क्र. ६० व ६१ यामध्ये पुढीलप्रमाणे निरीक्षण नोंदविले आहे.

"It is desirable for the State to consider the situation of the Head Constables, when even after 20 to 25 years of services, they are not getting any requisite promotion, though they are otherwise eligible for the same. It is for the State to frame policy in such situation".

"(e) The State to take early steps in view of the amended rule 3 (a) of Police Sub Inspector (Recruitment) (Amendment) rules, 2013 and the related circulars and the Policy Decisions in accordance with law."

आश्वासित प्रगती योजने अंतर्गत प्रत्यक्ष पदोन्नतीसाठी लागणारा विलंब दूर केल्यास पोलीस अंमलदारांचे मनोधैर्य उंचावून कार्यक्षमतेमध्ये वाढ होईल. तसेच, पोलीस दलातील पोलीस हवालदार व सहायक पोलीस उप निरीक्षक या तपासी अंमलदारांच्या संख्येत वाढ होऊन, पोलीस स्थानकाकरिता गुन्हे कामकाजाच्या तपासासाठी तपासी अंमलदार उपलब्ध होणार आहेत. सद्य:स्थितीत पोलीस शिपाई हा साधारणत: २४ वर्षानंतर पोलीस हवालदार या पदावर पदोन्नतीसाठी पात्र होतो. त्यामुळे त्यांचा ११ वर्ष सेवा कालावधी हा गुन्हे तपासकामी पोलीस दलास उपलब्ध होतो. पोलीस दलातील पदोन्नती साखळीतील अंमलदाराचे पोलीस नाईक हे पद रद्द केल्यामुळे सदर अंमलदार, आश्वासित प्रगती योजनेनुसार १० वर्षांनंतर पदोन्नतीने पोलीस हवालदार होईल आणि त्यांची अंदाजे २५ वर्ष सेवा पोलीस दलाकरिता गुन्हे तपासाकरिता मिळेल. तसेच पोलीस दलास प्रशिक्षीत अंमलदार व अधिकारी उपलब्ध होणार असल्यामुळे पोलीस दलाच्या व्यावसायिक कार्यकुशलतेमध्ये सकारात्मक बदल अपेक्षित आहे व त्यामुळे गुन्हे उघडकीस येण्याचे व रोखण्याचे प्रमाणामध्ये भरीव वाढ होण्यास मदत होईल. सद्य:स्थितीमध्ये पोलीस हवालदार व सहायक

पोलीस उप निरीक्षक या तपासी अंमलदारांचे अधिक मानवी दिवस गुन्हे तपासाच्या कामासाठी उपलब्ध होतील पर्यायाने, पोलीस अंमलदारांच्या कारकीर्दीमध्ये गुन्हे विषयक तपासामध्ये लक्षणीय वाढ होणार आहे.

२. पोलीस शिपाई संवर्गात सेवाप्रवेश होणाऱ्या अंमलदारास पदोन्नतीच्या ०३ संधी उपलब्ध होतील आणि त्यांना पोलीस उप निरीक्षक पदावर प्रत्यक्ष काम करण्याची संधी उपलब्ध होईल व त्यामुळे असे करताना नव्याने कोणतेही पद निर्माण न करता पोलीस नाईक संवर्गातील पदे प्रत्यार्पित करून, पोलीस अंमलदार निर्धारीत कालावधीमध्ये पदोन्नतीस पात्र होतील, या बाबी तसेच, मा.उच्च न्यायालयाने रीट याचिका क्र. ४०७८/२०१५ मधील परिच्छेद क्र.६० व ६१ मधील निरीक्षण व आदेश, गुन्हे तपासासाठी अधिक मनुष्यबळ उपलब्ध होऊन पोलीस दलाची प्रतिमा उंचावण्यास मदत करणारा, आश्वासित प्रगती योजनेचा लाभ घेतलेल्या पोलीस दलातील कर्मचारी यांना प्रत्यक्षात त्या पदावर काम करण्यास उद्युक्त करणारा व पोलीस दलाच्या एकूण आकृतीबंधात बदल होणार नाही इ. बाबी नमूद करून पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य कार्यालयाच्या अधिनस्त पोलीस घटकांमधील पोलीस शिपाई ते सहायक पोलीस उप निरीक्षक या पदोन्नती साखळीमधील पोलीस नाईक या संवर्गाची ३८,१६९ पदे व्यपगत/निरसित करून (राज्य राखीव पोलीस बल गटातील पोलीस शिपाई वगळून) नि:शस्त्र पोलीस शिपाई यांना आश्वासित प्रगती योजनेनुसार पोलीस उप निरीक्षक पदावर अधिकारी पदाची संधी उपलब्ध करून देण्याबाबत शासनास सादर केलेल्या प्रस्तावास संबंधित प्रशासकीय विभागाशी साधकबाधक विचारविनिमय करून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य कार्यालयाच्या अधिनस्त पोलीस घटकांमधील नि:शस्त्र पोलीस शिपाई ते सहायक पोलीस उप निरीक्षक (राज्य राखीव पोलीस बल गटातील पोलीस शिपाई वगळून) या पदोन्नती साखळीमधील पोलीस नाईक या संवर्गाची ३८,१६९ पदे व्यपगत/निरसित करण्यास आणि पोलीस शिपाई, पोलीस हवालदार व सहायक पोलीस उप निरीक्षक या संवर्गामध्ये वर्ग करण्यास मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर समितीने प्रदान केलेली मान्यता विचारात घेवून नि:शस्त्र पोलीस शिपाई यांना त्यांच्या सेवाकालावधीत आश्वासित प्रगती योजनेनुसार पदोन्नती साखळीने पोलीस उपनिरीक्षक पदावर पदोन्नती संधी उपलब्ध करून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. पोलीस दलासाठी सद्य:स्थितीत मंजूर असलेल्या संवर्गातील मंजूर पदसंख्येमध्येच पुनर्रचना करून "पोलीस नाईक" हा संवर्ग रद्द करून या संवर्गातील पदे पोलीस शिपाई, पोलीस हवालदार व सहायक पोलीस उप निरीक्षक या संवर्गामध्ये खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | मंजुर पदे | पुनर्रचने पश्चात पदे |
|---|---|---|---|
| १ | पोलीस शिपाई | ८५,०३९ | १,०८,०५८ |
| २ | पोलीस नाईक | ३८,१६९ | ० |
| ३ | पोलीस हवालदार | ३७,८६१ | ५१,२१० |
| ४ | सहायक पोलीस उप निरीक्षक | १५,२७० | १७,०७१ |
| ५ | पोलीस उप निरीक्षक पदोन्नती ) (कोटा | ४,८६९ | ४,८६९ |
| | **एकूण** | **१,८१,२०८** | **१,८१,२०८** |

यामध्ये, कोणतीही नवीन अतिरिक्त पदनिर्मिती करण्यात येणार नाही. त्यानुसार पोलीस महासंचालक कार्यालयाने सुधारित आकृतीबंध तयार करून घेण्याची कार्यवाही करावी.

३. पोलीस दलामध्ये किमान ३० वर्षे सेवा पूर्ण असलेले आणि सहायक पोलीस उप निरीक्षक या पदावर किमान ०३ वर्षे सेवा पूर्ण असलेले आणि आश्वासित प्रगती योजनेनुसार पोलीस उप निरीक्षक संवर्ग पदाची वेतन श्रेणी घेत असलेले असे तीनही निकष पूर्ण करणारे सहायक पोलीस उप निरीक्षक संवर्गातील अंमलदारांना "श्रेणी पोलीस उप निरीक्षक (Grade PSI)" असे संबोधण्यात येईल.

४. पोलीस दलामध्ये महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय क्र.पीएनएच-०२९१/सीआर-२७२/पोल-५(अ), दिनांक ०४ नोव्हेंबर १९९२ अन्वये, पोलीस नाईक संवर्गाची पद निर्मिती करण्यात आली. सदरचा संवर्ग मृत संवर्ग म्हणून घोषित (Dying Cadre) करण्यात येत आहे.

५. पोलीस नाईक संवर्गाची पदे व्यपगत करताना आणि पोलीस शिपाई, पोलीस हवालदार व सहायक पोलीस उप निरीक्षक या संवर्गात वाढीव पदे निर्माण करण्यास शासनाच्या उच्चस्तरीय समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

अ) सहायक पोलीस उप निरीक्षक संवर्गात या आदेशाद्वारे १,८०१ वाढीव पदे निर्माण करण्यात येत आहेत.

ब) पोलीस हवालदार या संवर्गात या आदेशाद्वारे १३,३४९ वाढीव पदे निर्माण करण्यात येत आहेत.

क) वरील “अ”प्रमाणे कार्यवाही झाल्यानंतर पोलीस हवालदार संवर्गातील कर्मचारी यांना सहायक पोलीस उप निरीक्षक या पदावर पदोन्नतीच्या अटी व शर्ती पुर्ततेच्या अधीन राहून आणि विहित कार्यपद्धती अनुसरून पदोन्नतीची कार्यवाही करण्यात यावी.

ड) वरील “ब” व “क” प्रमाणे कार्यवाही झाल्यानंतर पोलीस नाईक संवर्गातील कर्मचारी यांना पोलीस हवालदार या पदावर पदोन्नतीच्या अटी व शर्ती पुर्ततेच्या अधीन राहून आणि विहित कार्यपद्धती अनुसरून पदोन्नतीची कार्यवाही करण्यात यावी.

इ) वरील “क” आणि “ड” प्रमाणे पदोन्नती अंती पोलीस नाईक यांची जेवढी पदे रिक्त होतील तेवढी पदे व्यपगत करण्यात यावीत.

ई) पोलीस नाईक संवर्गातील कर्मचारी दुसऱ्या व त्यापुढील टप्प्यात जसे-जसे पोलीस हवालदार पदावर पदोन्नत होतील, तेवढीच पोलीस नाईक संवर्गातील तेवढी रिक्त पदे क्रमाक्रमाने व्यपगत करण्यात यावीत आणि तेवढीच पदे उच्चस्तर समितीने दिलेल्या मान्यतेनुसार पुनर्रचना पश्चात पदसंख्या मर्यादेत पोलीस शिपाई संवर्गात निर्माण करण्यात यावीत. जोपर्यंत पोलीस नाईक संवर्गातील संपूर्ण पदे व्यपगत होत नाहीत, तोपर्यंत ही कार्यवाही करण्यात यावी.

६. या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पोलीस नाईक संवर्गातील पदांवर पदोन्नतीने नियुक्ती देण्याची कार्यवाही करण्यात येणार नाही. पोलीस नाईक संवर्गातील सद्य:स्थितीत कार्यरत असलेले कर्मचारी यांचा उच्चस्तरीय समितीने मान्यता दिल्यानुसार अटी व शर्तीची पूर्तता करीत असलेल्या कर्मचारी यांना पोलीस हवालदार संवर्गात टप्याटप्याने पदोन्नत करण्याची कार्यवाही करण्यात यावी. ज्या पोलीस नाईक पदावरील कर्मचारी यांची सेवा पदोन्नतीने वर्ग करणे शक्य होणार नाही ते नियतवयोमानाने सेवानिवृत्ती होईपर्यंत “पोलीस नाईक” म्हणून कार्यरत राहतील.

७. पोलीस उप निरीक्षक संवर्गातील लोकसेवा आयोगामार्फत सेवाभरती होत असलेल्या विभागीय परीक्षा परिक्षेद्वारे भरण्यात येणारी २५% पदे भरण्यासंदर्भात दिनांक ३१ डिसेंबर, २०२३ पर्यंत मागणीपत्र पाठविण्यात येईल व त्यानंतर पोलीस उप निरीक्षक संवर्गातील पदोन्नतीचा कोटा ५०% करण्यात येत आहे. लोकसेवा आयोगामार्फत मर्यादित विभागीय परिक्षा भरती संदर्भात, घेण्यात येणारी परिक्षेसाठी दिनांक ३१ डिंसेंबर, २०२३ नंतर मागणीपत्र पाठविण्यात येणार नाही. यासंदर्भात सेवाप्रवेश नियमात यथावकाश सुधारणा करण्यात येईल.

८. पोलीस उप निरीक्षक संवर्गातील पदोन्नती कोट्यातील पदे निव्वळ पदोन्नतीने भरल्यानंतरही, पोलीस दलामध्ये ३० वर्षे सेवा पूर्ण केलेले, सहायक पोलीस उप निरीक्षक पदावर किमान ३ वर्षे सेवा केलेले आणि आश्वासित प्रगती योजनेच्या लाभानुसार पोलीस उप निरीक्षक संवर्गाच्या पदाची वेतन श्रेणी घेत असलेले असे तीनही निकष पूर्ण करणारे सहायक पोलीस उप निरीक्षक यांना "श्रेणी पोलीस उप निरीक्षक (Grade PSI)" संबोधण्यात यावे. असे श्रेणी पोलीस उप निरीक्षक त्यांना नियमित पोलीस उप निरीक्षकाची पदोन्नती मिळेपर्यंत सहायक पोलीस उप निरीक्षकाचीच कर्तव्ये व जबाबदाऱ्या पार पाडतील.

९. श्रेणी पोलीस उप निरीक्षक आणि सहायक पोलीस उप निरीक्षक यांची एकत्रित सेवाज्येष्ठता सूची पोलीस महासंचालक कार्यालयामध्ये तयार करावी.

१०. सेवा ज्येष्ठतेनुसार पदोन्नतीने नियुक्त होणाऱ्या पोलीस उप निरीक्षक यांना महाराष्ट्र पोलीस अकादमी येथे ३ महिने कालावधीचे प्रशिक्षण देण्यात येते. त्याच धर्तीवर श्रेणी पोलीस उप निरीक्षक (Grade PSI) म्हणून संबोधले जाणाऱ्या सहायक पोलीस उप निरीक्षकास महाराष्ट्र पोलीस ॲकॅडमी, नाशिक येथे १२ आठवड्यांचे प्रशिक्षण अनिवार्य असेल. सदरहू प्रशिक्षणात गुन्हे तपास व त्यासंबंधित बाबींचा आणि नियमित पोलीस उप निरीक्षक यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षण बाबींचा समावेश करण्यात यावा. यासाठी महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक संस्थेमार्फत अतिरिक्त पोलीस महासंचालक (प्रशिक्षण) यांच्याशी विचार-विनिमय करून अभ्यासक्रम निश्चित करण्यात यावा व त्यास शासनाची मान्यता घेण्यात यावी.

११. पोलीस अंमलदारांची गुणवत्ता वर्धित होणेचे दृष्टिकोनातून, पोलीस शिपाई ते पोलीस हवालदार या पदोन्नतीच्या टप्प्यावर पदोन्नती पूर्वी किमान १० आठवड्यांचे आणि पोलीस हवालदार ते सहायक पोलीस उप निरीक्षक या टप्प्यावरील पदोन्नती पूर्वी किमान १० आठवड्यांचे पदोन्नती पूर्व प्रशिक्षण (Pre-Promotion Training) पोलीस प्रशिक्षण विद्यालये येथे अनिवार्य असेल.

१२. श्रेणी पोलीस उपनिरीक्षक (Grade PSI) म्हणून संबोधन केवळ वैयक्तिकरित्या राहील व संबंधित सहायक पोलीस उप निरीक्षक यांचे सेवानिवृत्तीपर्यंत किंवा ते पोलीस उप निरीक्षक पदावर नियमित पदोन्नती होईपर्यंत लागू राहील. सहायक पोलीस उप निरीक्षक आणि श्रेणी पोलीस उप निरीक्षक ( Grade PSI ) यांचे एकुण १७,०७१ संख्याबळ एकत्रित (One Block) व स्थिर (Constant) राहील.

१३. श्रेणी पोलीस उप निरीक्षक म्हणून संबोधित करण्यात येणाऱ्या अधिकाऱ्याच्या गणवेशात अतिरिक्त एक स्टार समाविष्ट करण्यात यावा. त्यानुसार गणवेशातील अनुषंगीक बदलाच्या दृष्टिकोनातून मुंबई पोलीस मॅन्युअल १९५९ खंड १ प्रकरण ७ अंतर्गत आवश्यक ते बदल करण्यात यावेत.

१४. या शासन निर्णयामधील सूचना/आदेशांची अंमलबजावणी करण्यासाठी पोलीस महासंचालक यांनी त्यांच्या स्तरावर सुकाणू (Steering) समिती गठीत करावी. उपरोक्त सुचना/आदेशानुसार अंमलबजावणी करताना उद्भवणाऱ्या समस्या व अडचणींचे निराकरण समितीने करावे. एखाद्या मुद्दा/बाबी संदर्भात शासन स्तरावरून निर्णय अपेक्षित असल्यास आवश्यकतेप्रमाणे समितीचे अभिप्राय व शिफारशींसह प्रस्ताव शासनास सादर करावा.

१५. उपरोक्त शासन निर्णय शासनाच्या उच्चस्तरीय समितीने दिनांक १४.१०.२०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५२/आपुक, दिनांक १३.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०२२५१८२११२३४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
Date: 2022.02.25 18:23:20 +05'30'

**( राहुल कुलकर्णी )**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रती,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. सभापती, महाराष्ट्र विधापरिषद यांचे सचिव
४) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव
५) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) सर्व सन्मानीय संसद, विधानसभा, विधानपरिषद सदस्य यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक
८) मा.मंत्री (गृह ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
९) मा.राज्यमंत्री (गृह )(शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

११) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) अपर मुख्य सचिव (ले व को), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
१८) महासमादेशक, होमगार्डस,महाराष्ट्र राज्य,मुंबई
१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई
२०) सर्व अपर पोलीस महासंचालक/पोलीस आयुक्त/विशेष पोलीस महानिरीक्षक
२१) सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक
२२) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर
२३) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र मुंबई/नागपूर
२४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२६) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
२७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२८) वित्त विभाग (व्यय-७/आपुक/सेवा-९)/सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई
२९) निवडनस्ती /पोल-५ ब, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.